# समुदाय

**-- चं.प्र.देशपांडे.**

कोरसः पुरुष १, पुरुष २, आणि स्त्री १.

तिघेहीः आम्ही प्रश्न सोडवणार नाही.
आम्ही प्रश्न सोडवणार नाही.
आम्ही प्रश्न सोडवणार नाही.

पु.१ : प्रश्न सोडवणं म्हणजे या प्रश्नांच्या जागी दुसरे प्रश्न स्थापन करणं.

पु.२ : प्रश्नांची उत्तरं म्हणजे प्रश्नांची सोडवणूक नसते.

स्त्री १ : प्रश्न सोडवता येतच नाहीत, ते फक्त समजून घेता येतात.

पु.१ : ही काही नांदी नव्हे.

पु.२ : नांदीच्या अडथळ्याशिवायही नाटकं होऊ शकतात.

स्त्री १ : विश्वाच्या निर्मितीपूर्वी काहीच नव्हतं.

पु.१ : नाही. विश्वाच्या निर्मितीपूर्वी फक्त शब्द होता.

पु.२ : विश्वाच्या निर्मितीपूर्वी फक्त ओंकार होता.

स्त्री १ : नंतर भुंकार आला.

तिघेही : आणि संघर्ष सुरू झाला.

पु.१ : तो संघर्ष म्हणजेच निर्मिती.

पु.२ : नाही. संघर्ष म्हणजे विनाश.

स्त्री १ : की संघर्ष म्हणजे स्थिती ?

तिघेही : शब्द म्हणजे बुध्दीचा पाया.

स्त्री १ : आणि भावनेचा नाही ?

पु.१ : माणूस बुध्दिमान असतो.

पु.२ : म्हणूनच न्यायालयं असतात.

स्त्री १ : शहाण्यानं कोर्टाची पायरी चढू नये.

पु.१ : खालच्या कोर्टाहून वरचं कोर्ट शहाणं असतं.

पु.२ : वरच्या कोर्टाहून त्याच्यावरचं कोर्ट शहाणं असतं.

स्त्री १ : सगळ्यात वरचं कोर्ट सगळ्यात शहाणं असतं.

पु.१ : त्याच्यावर एक कोर्ट ठेवलं तर ते त्याच्याहून शहाणं असेल ?

पु.२ : मग थांबणार कुठं ?

स्त्री १ : कुठं तरी थांबायला हवं म्हणून एक सगळ्यात वरचं कोर्ट असंत आणि ते एकच असतं.

तिघेही : सगळ्यात वरचं कोर्ट सगळ्यात शहाणं असतं.

स्त्री १ : असं म्हटल्यानं कोर्टाची प्रतिष्ठा वाढते.

पु.१ : निर्णय लागतात.

पु.२ : मार्ग मोकळे होतात.

स्त्री १ : दारावर थापा पडताहेत.

पु.१ : कोण असेल ?

पु.२ : म्हणजे निवांत राहता येणारच नाही ?

स्त्री १ : काहीतरी घडायला हवंच.

पु.१ : काय घडणं बरोबर होईल ?

पु.२ : काय घडणं चांगलं होईल ?

पु.१ : ते कोण असतील ? खुनी ?

पु.२ : नाही. मित्रसुध्दा असतील.

स्त्री १ : पण ते कुणीतरी दुसरे असणार एवढं नक्की. दारावर थापा काही आपणच मारणार नाही.

पु.१ : मग आपण कोण ?

पु.२ : आपण कोरस. एक समूह.

स्त्री १ : पण मला बाई याच्यात इंटरेस्ट आहे. दारावर थाप पडली की कसं रोमांचित वाटतं.

पु.१ : तुला काय वाटलं, तो तुझा नवरा असेल ?

पु.२ : छे ! छे ! उलट तिला वाटलं की तो नवरा नसणारच.

पु.१ : म्हणजे ही कुणाची तरी वाट पाहात होती ?

पु.२ : दुसऱ्या पुरुषाची.

स्त्री १ : तुम्हाला नाही आवडत दुसरी स्त्री ?
दुसऱ्या अनेक स्त्रिया ?

पु.१ : आता संघर्ष सुरू झाला.

पु.२ : आपण यात भाग घ्यायचा नाही.

स्त्री १ : कारण आपण शहाणे आहोत.

तिघेही : होय. आहोतच.( जातात )
( दारावर थापा पडतात. स्त्री येते.)

स्त्री : कोण आहे ? ( पुढे जाते. तिथूनच आवाज ) ओहो ! समुदाय ! समू ! तू ! ये ना, आत ये !

समुदाय : ( तिथूनच आवाज. हे दुसऱ्यांना उद्देशून ) तुम्ही थांबा बाहेर -- सध्या मी एकटाच ठीक आहे.

स्त्री : अरे असं काय करतोस ? या की सगळे आत !

समुदायः बरं, चला. (स्त्री, समुदाय आणि त्याच्याबरोबर इतर चार माणसे येतात. समुदायचं वय सुमारे चाळीस. काळी पँट, पांढरा फुलशर्ट आणि त्यावर पांढरंच जाकीट. बाकीच्या चार माणसांत एक तरुण -- नेहमीचा नॉर्मल पोशाख. एक पंडित -- सुमारे साठ -- धोतर, शर्ट, पगडी. कारखानदार -- सुमारे पंचेचाळीस -- सूटबूट आणि प्राध्यापक -- सुमारे चाळीस -- पँट, फुल शर्ट. पाचही जणांनी काळे चष्मे घातलेले.)

स्त्री : खूप बरं वाटलं, घरी आलास ते !

समुदायः आता जरा जास्त धाडस करायला हरकत नाही. तेच सांगायला आलो होतो मी.

स्त्री : म्हणजे ?

समुदाय : पार्श्वभूमी जवळजवळ पूर्ण होत आलेली आहे. तूसुध्दा वागण्यात हळूहळू बेफिकिरी वाढवत जायला हरकत नाही.

कारखानदारः उत्पादन कमी पडतंय आणि किंमती वाढतायत.

तरुण : कॉलेजेस सारखी बंद पडतायत.

प्राध्यापकः आम्हा प्राध्यापकांतही सामाजिक असंतोष धुमसतोय.

पंडित : चारित्र्याचे बारा वाजत चालले आहेत.

समुदाय : आणि म्हणूनच निष्ठेची महती वाढत चाललेली आहे. निष्ठावान तत्र दुर्लभः !काय पंडितजी, बरोबर ना !

स्त्री : अरे, पण आपल्या प्रश्नाशी या सगळ्या गोष्टींचा काय संबंध ? आपला प्रश्न खाजगी आहे.

समुदाय : खाजगी आणि सामाजिक -- सगळे प्रश्न एकमेकांत गुंतलेले असतात. तसंच आहे ते. तू फक्त माझ्यावर विश्वास ठेव.

स्त्री : विश्वास आहेच रे !

समुदायः: बरं, तू मला सध्याच्या तुमच्या संबंधाविषयी थोडक्यात माहिती सांग.

स्त्री : तुला माहितीच आहे, लग्न झाल्यावर पाहिले काही महिने आमचे बरे गेले. नंतर भांडणं व्हायला लागली. अनेक कारणांवरून ते माझ्यावर सारखे चिडायला लागले. इतके की मीही हळूहळू कोडगी होत चालले. नंतर त्यांच्या लक्षात यायला लागलं की सारखं चिडण्यानं सगळ्यांच्याच आयुष्याची नासाडी होते आहे. माणसं सगळी वेगळीवेगळीच असणार. कुठल्याही दोन व्यक्तींचं संपूर्ण पटू कसं शकेल ? म्हणून मग त्यांनी पुन्हा माझ्याशी प्रेमानं वागायचं असं ठरवलं. तसा प्रयत्नही सुरू केला. पण आमच्या संबंधातली शोकात्मता काही गेलेली नाही. माझ्यात त्यांना हवे ते बदल व्हावे म्हणून त्यांचे चाललेले प्रयत्न आणि आता मी आहे तशीच राहिले तरी माझ्यावर प्रेम करावं म्हणजे आयुष्य सुखाचं होईल म्हणून त्यांचे

चाललेले सध्याचे प्रयत्न -- सारखेच कंटाळवाणे आहेत. आमच्या संबंधात ताजं, नवं असं काही राहिलेलंच नाही. म्हणून तर मला तुझं आकर्षण वाटलं.

समुदाय : माझ्यात काय वेगळं वाटलं तुला ?

स्त्री : तुझा वेगळेपणाच. नावीन्य. शिवाय तुझ्यात विविधता आहे. स्त्रीला तू दर खेपेला नव्यानं जवळ घेऊ शकतोस. जणू पहिल्यांदाच स्त्री हाती लागल्यासारखा नवेपणा असतो तुझ्यात दरवेळी. किती वेगवेगळ्या पध्दतीनी तू सहवास फुलवू शकतोस !

समुदाय : अच्छा ! मिस्टर नवरे कुठं फिरतीवर गेलेत ना !

स्त्री : हो ! मधनंमधनं ते फिरतीवर जातात तेवढं एक बरं आहे. पण आज येतील बहुतेक .

समुदाय : बरं, मी सांगितलेलं लक्षात ठेव.

स्त्री : हं, मीही वाटच पाहतेय संधीची ! काय म्हणून एकाच माणसाची मक्तेदारी ! आणि हुकुमशाही ?

समुदाय : आता तू निश्चिंतपणे बेफिकिरी वाढवू शकतेस ! थोड्याच दिवसांत आपण राजरोस जवळ येऊ ! ( पंडितजीकडे जाऊन ) निष्ठावान् तत्र दुर्लभः ! काय पंडितजी ! ( हसतो ).

पंडित : तू नुसता नावाचा समुदाय आहेस. कोटेशन तुला हे एवढं एकच माहिती दिसतंय. संस्कृत शीक जरा. संस्कृतात अशी ढिगानं आहेत वाक्यं -- शिरसि मा लिख, मा लिख --हे त्यातलं आणखी एक ! चला !

समुदाय : ( हसून ) पंडितजी म्हणजे -- बरं, चला.

स्त्री : ( खाली पाहात ) जवळ नाही घेणार ?

समुदाय : सॉरी, का नाही, का नाही -- ( तिला जवळ घेतो. पाठीवरून, मानेवरून, केसांवरून हात फिरवतो, कपाळाचं चुंबन घेतो. निघतो.) आज आल्यावर मुद्दाम सांग त्याला -- समुदाय आला होता म्हणून.

स्त्री : हं.

समुदाय : अच्छा ! ( समुदाय आणि त्याच्या बरोबरचे चौघेजण जातात. स्त्री गोड विचारात उभी. जरा वेळाने श्री. नवरे येतात. हा हिचा नवरा.)

स्त्री : ( नवऱ्याला पाहून चेहऱ्यावरची गोडी जाते. ) -- मघाशी समुदाय आला होता.

नवरे : भेटला वाटेत मला. पण आल्याबरोबर अगदी हेच एक सांगायची काही आवश्यकता नव्हती.

स्त्री : तुम्हाला भेटला तो वाटेत ?

नवरे : हो. ( बॅग वगैरे ठेवून ) तुझ्याशी गप्पा मारायला आला होता म्हणे.

स्त्री : हो.

नवरे : ( जरा वेळानं ) अग, हे बर नव्हे, अं. नवरा नसताना, परकं कुणी येऊन स्त्रीशी गप्पा मारत बसतं -- म्हणजे चर्चा जरा वेगळी होते त्याची.

स्त्री : चर्चा होऊ दे ! तुम्हाला मत्सर वगैरे वाटला नाही म्हणजे झालं -- अलीकडे खूप कंटाळा येतो मला -- त्याच्याशी गप्पा मारायला आवडतं मला -- छान आहे तो -- कसा फ्रेश वाटतो.

नवरे : त्याच्याबद्दल बरंच बोलावंसं वाटतं म्हणजे तुला --

स्त्री : तसं तुम्ही फिरतीवर असल्यावर अनेकदा येतो तो -- कदाचित मी बऱ्याचदा तुम्हाला सांगायची विसरले मागे -- म्हणून आज आठवणीनं मुद्दाम सांगितलं -- उगीच संशयाचं वातावरण नको.

नवरे : अस्सं ! म्हणजे आता मी हेही समजून घ्यावं आणि शांत राहावं अशी अपेक्षा दिसतीय तुझी ?

स्त्री : चिडणं किंवा शांत राहणं याशिवाय नाहीतरी काय करणार तुम्ही ?

नवरे : ( संताप आवरत ) बरं मी गावाहून आलोय प्रवासातून -- काही चहा वगैरे नाही करणार का ?

स्त्री : मला कंटाळा आलाय, तुमचा तुम्ही घ्या करून.

नवरे : ठीक आहे.( आत जातो. त्या दृश्यावर प्रकाश कमी होत जाऊन कोरसवर प्रकाश पडतो.)

तिघेही : एखाद्या माणसाचं नाव समुदाय कसं असेल ? हे खरं वाटत नाही. खोटं वाटतं. थिल्लरपणा वाटतो हा सगळा.

स्त्री १ : आणि समुदायबरोबरची ती माणसं कोण होती ?

पु.१ : कारखानदार, तरुण, पंडितजी आणि प्राध्यापक.

पु.२ : मग कामगार, मंत्री, डॉक्टर का नकोत ?

तिघेही : हा कसला समाज ?

पु.१ : तरीही पुढं काय होतं ते पाह्यला हवं.

पु.२ : त्या नवाराबायकोचा संवाद आपण मधेच तोडला.

स्त्री १ : अशा परिस्थितीत नवऱ्याची समजूत आणि शांतता किती टिकणार ?

पु.१ : प्रथम त्यांचं संभाषण झालं.

पु.२ : मग वादावादी झाली.

स्त्री १ : आणि मग मारामारी झाली. म्हणजे अर्थातच नवऱ्यानं बायकोला मारलं, स्त्रीच खरी सहनशील असते.

पु.१ : पण त्याला त्याचा गवगवा व्हायला नको होता.

पु.२ : पण तो तिनं केलाच.

स्त्री १ : तिला तो करायचाच होता.

पु.१ः : पुढं या घरगुती भांडणाची केस झाली.

पु.२ : खटला झाला.

स्त्री १ : बरोबर कोण हे ठरवणं आवश्यक होतं.

तिघेही : आता चर्चा, वाद, सगळ्या बाजू, न्यायनिवाडा वगैरे सगळं अटळ होतं.
अटळ होतं.
अटळ होतं. ( जातात. )
( आताच्या दृश्यात स्त्री, श्री. नवरे, समुदाय, त्याच्या बरोबरचे चार लोक हे सगळे आहेत. प्रेक्षकांच्या बाजूला न्यायाधीश आहे अशी या दृश्याची कल्पना.)

समुदाय : ठीक आहे. जरा शांतता. शांता प्लीज ! हं, तर न्यायाधीशमहाराज, मला सुरुवातीलाच आपल्याला एक विनंती करायची आहे. आपण आता काय काय पाहाल आणि ऐकाल याचा मलाही तसा सगळा अंदाज नाही. परंतु माझी आपल्याला अशी विनंती आहे की इथं घडणाऱ्या गोष्टींचा आपल्यावर कोणताही परिणाम होऊ देऊ नये. कुणाचीही काहीही बाजू आली तरी आपण ती निर्विकारपणे पाहावी -- ऐकावी आणि शेवटी या सगळ्याचा आपल्या विचारावर अजिबात परिणाम होऊ देऊ नये. आपण स्वतंत्र, स्वच्छ, निरपेक्ष विचारानं निकाल द्यावा. यासाठी आपण आपल्या नेहमीच्या प्रथेप्रमाणे बसल्या बसल्या डोळे मिटून झोपी गेलात तर उत्तम, म्हणजे याचा कशाचाच आपल्यावर परिणाम होणार नाही. किंवा आपण आधीच निकाल तयार ठेवावा आणि मग हे सर्व होऊ द्यावं -- म्हणजे आपला निकाल स्वतंत्र राहील आणि आमच्या विचारांपासून मुक्त राहील. आपण हे काहीच पाहण्या--ऐकण्याची आवश्यकता नाही. न्यायाधीश म्हणजे काही एखाद्या थिएटरमधला प्रेक्षकवर्ग नव्हे. असो.

नवरे : हे सगळं आपण बडबडत बसायची काही आवश्यकता नव्हती. ते न्यायाधीश असतील नाहीतर प्रेक्षक असतील. तुम्ही मात्र न्यायालयात आहात हे समजून राहा आणि इथं आवश्यक तो अभिनय करा आणि संवाद म्हणा म्हणजे झालं. आपण रंगमंचावर आहोत असं समजू नका.

समुदाय : न्यायाधीश झोपी गेले तर त्यांचं काम चांगलं आणि शुध्द होतं. प्रेक्षक जागे राहिले तर त्यांचं काम चांगलं होतं एवढंच मला सुचवायचं होतं. न्यायाधीशानं स्वतःला प्रेक्षक समजू नये आणि प्रेक्षकांनीही स्वतःला न्यायाधीश समजू नये.

प्राध्यापक मला वाटतं, सध्या आपण तिथं न्यायाधीश नाहीतच असं समजून चालू.

समुदायः आणि प्रेक्षक आहेत असंही समजून चालू की !

पंडित : हे बघ समुदाय, कुत्सितपणानं बोलणं तुला तरी शोभत नाही.

स्त्री : माझा कुणी विचार करणार आहे की नाही !

तरुण : ( उठून उभा राहात ) बस की तू. आता तेच सुरू होतंय.

नवरे : नाही. तिनं बसता कामा नये. कारण या सगळ्या प्रकारात तिच्या चेहऱ्यावरचे हावभाव, बदल हे सगळं महत्त्वाचं आहे. ते सगळं सगळ्यांना दिसलं पाहिजे. खोटेपणाचा बऱ्याच वेळी शब्दातून अंदाज येत नाही पण चेहऱ्यावर तो दिसतो.

समुदाय : ते ठीक आहे. पण बऱ्याच वेळी चेहऱ्यावरचे हावभाव हे अवतीभवतीच्या परिस्थितीचा परिणाम असतात. ते खरेच असतात असं नाही. तिच्याबद्दलचे अंतिम निर्णय घेताना तिच्या चेहऱ्यावरचे बदल पाहून बांधलेले अंदाज फार महत्त्वाचे ठरू नयेत. ते सर्व न लक्षात घेताही तिच्याबद्दल योग्य तो निर्णय घ्यायची आपल्याला अक्कल पाहिजे.

प्राध्यापकः मला वाटतं, तिला उभी राहू द्या पण चेहऱ्याबिहऱ्याला आपण महत्त्व देऊ या नको. या तोडग्यानं दोन्ही

बाजूंचं समाधान होईल आणि आपण याच मुद्यावर अडून राहणार नाही.( यावर कुणी फारसं बोलत नाही. नाराजीनं मान्यता.)

समुदाय : मला वाटतं, या प्रकारात फार बोलत बसायची आवश्यकताच नाही. माझं तिला आकर्षण वाटतं यात सगळं काही आलं.

नवरे : नाही. हे चूक आहे. माझी लग्नाची बायको आहे ती. आणि तिला नवऱ्याखेरीज दुसऱ्या कुणाचं आकर्षण वाटणं ही अनैतिकता आहे. यासाठी मी तिला मारझोडही करू शकतो.

स्त्री : पण यात निष्ठांच्या खरेपणाची काहीच किंमत नाही ? एकाच व्यक्तीच्या तालावर नाचणं आणि एकाच व्यक्तीशी एकनिष्ठ राहणं हा मला जुलूम वाटतो. प्रत्येक ठिकाणच्या माझ्या निष्ठा खऱ्या आहेत की नाहीत हे फार तर त्या त्या वेळेपुरतं तुम्ही तपासू शकता.

नवरे : मग माझ्या निष्ठा काय खोट्या आहेत ? तू माझी बायको आहेस आणि मी तुझ्याकडे बायको म्हणूनच पाहणार आणि तुझ्याकडून त्या नात्याच्या सगळ्या अपेक्षा ठेवणार -- या माझ्या निष्ठा काय खोट्या आहेत ? आणि आमच्या दोघांच्याही निष्ठा खऱ्या धरल्या तरी आमचं लग्न झालेलं आहे ही माझ्या बाजूची आणखी एक जमेची बाजू आहे. त्यामुळं या बाबतीत तिनं माघार घेतली पाहिजे.

पंडित : दुसऱ्या कुठल्यातरी परिस्थितीमुळं किंवा वस्तुस्थितीमुळं खऱ्या निष्ठांचं महत्त्व किंवा बळ वाढत नाही किंवा कमी होत नाही. निष्ठा ती निष्ठा.

कारखानदारः आणि मी कारखानदार असलो तरी संस्कृती मानतो. स्त्री आणि समुदाय यांच्या संबंधालाही एक परंपरागत पावित्र्य आहे. ते टिकलंच पाहिजे.

समुदाय : ( कारखानदाराला ) तू जरा वेळ गप्प बस. निष्ठांचं महत्त्व एकदा मान्य झालं की मग बाकीचा प्रश्न येत नाही.

नवरे : वागताना मनात डावपेच नसणं आणि प्रामाणिकपणा असणं म्हणजे निष्ठा खरी असणं एवढाच याचा अर्थ होतोय. पण अशी निष्ठासुध्दा बरोबर किंवा चूक असू शकेल. अशा निष्ठेचेसुध्दा चांगले किंवा वाईट परिणाम होऊ शकतील.

समुदाय : बरोब्बर ! म्हणूनच अशा वेळी संख्या महत्त्वाची असते, निष्ठांचं स्वातंत्र्य किती लोकांना मिळतं हे महत्त्वाचं ठरतं. एककल्ली नेतृत्वापेक्षा सामुदायिक नेतृत्वाचं महत्त्व जास्त आहे ते यामुळंच.

नवरे : अहो पण निर्णय धेताना एक कुठलातरी विचार, एक कुठलातरी मार्गच प्रभावी ठरणार की नाही ? आणि एखादी निष्ठा,एखादा विचार प्रभावी ठरण्याची कारणं अनेक असू शकतील. योग्य विचारच प्रभावी ठरेल हे कशावरून ? आणि मग आपला विचार प्रभावी ठरवण्याचं प्रत्येकाला स्वातंत्र्य देऊन तरी काय उपयोग काय ?

प्राध्यापकः मला वाटतं, विचाराला योग्य किंवा अयोग्य म्हणून त्याच्या मूळ पावित्र्याला आपण बाधा आणू नये. विचार पवित्र असतात. ते येत राहिले पाहिजेत. ही सगळी नुसती गुंतागुंत आणि विपर्यास होतो आहे.

नवरे : ( चिडून ) मग विचारांना पवित्र तरी कशाला म्हणायचं ? नुसतंच ' विचार ' म्हणावं. आणि मग ' विचार येत राहिले पाहिजेत 'आणि ' विचार येत राहण्याची काही आवश्यकता नाही' हे दोन विचारच झाले की ! दोन्ही विचारांना योग्य - अयोग्य म्हणू नये किंवा पवित्र--अपवित्रही म्हणू नये. नुसतंच दोन्ही विचार महत्त्वाचे आहेत म्हणून हवेत ठेवून द्यावे.

समुदाय : ही सगळी नुसती गुंतागुंत आणि विपर्यास होतो आहे.
( कोरसचा प्रवेश. दृश्यावर अंधार. कोरसवर प्रकाश.)

कोरस तिघेही : ही सगळी नुसती गुंतागुंत आणि विपर्यास होतो आहे. ही सगळी नुसती गुंतागुंत आणि विपर्यास होतो आहे. .

पु.१ : विचारांनी दुसरं काय होणार ?

पु.२ : विचारांनी दुसरं काय होणार ?

स्त्री.१ : विचारांनी दुसरं काय होणार ?

तिघेही : विचारांनी दुसरं काय होणार ?

स्त्री १ : थांबा.
विचार फार काळ सहन होणार नाहीत.
प्रेक्षकांना घटना लागतात. कृती हवी असते.

मी स्त्री असल्यानं कृतीचं महत्त्व मला जास्त समजतं.
विचारात निर्मिती नसते. कृतीत निर्मिती असते.

पु.१ : अशा समजुतदार स्त्रिया जगभर होवोत.

पु.२ : सगळ्या स्त्रिया अशा समजुतदार होवोत.

दोघेही : कृतीतून निर्मिती झिंदाबाद.

पु.१ : मला वाटतं, हे विचारबिचार फार चालणार नाहीत.

पु.२ : विचारांनी प्रश्न सुटत नाहीत हे दिसलं की माणसं कृती करतातच.

स्त्री १ : पण त्या कृतीमागे विचारांचं महत्त्व असतं हे वाईट आहे.

तिघेही : हे वाईट आहे.
हे वाईट आहे.
हे वाईट आहे.( जातात. दृश्यावर प्रकाश. )

समुदाय : तर मला असं म्हणायचंय की सगळ्या विचारांना महत्त्व आहे हे एकदा मान्य केल्यावर, असंख्य माणसं जेव्हा काही प्रयत्न करत असतात तेव्हा तो सगळा खटाटोप निव्वळ मूर्खपणात जमा धरणं योग्य ठरणार नाही. त्या प्रयत्नात फार तर आपण दुरुस्त्या सुचवाव्यात. किंवा वेगळ्या दिशा सुचवल्या तरी चालतील.

नवरे : ( संतापून ) मी अशी दुरुस्ती सुचवतो की हे सगळे प्रयत्न हा निव्वळ मूर्ख खटाटोप असल्याने प्रथम ते थांबवावेत.

समुदाय : ( शांतपणे ) याला दुरुस्ती म्हणत नाहीत.
दुरुस्ती सुचवताना मुळातलं काहीतरी शिल्लक राहिलं पाहिजे.

नवरे : तुझी बायको अशी वागली तर असंच म्हणशील का रे भडव्या ?

समुदाय : काल्पनिक प्रश्न नकोत.

नवरे : म्हणजे माझी बायको नव्वद टक्के माझ्याकडे राहावी आणि दहा टक्के तुझ्याकडे आली तरी चालेल अशी दुरुस्ती सुचवू होय रे हलकटा ?

पंडित : आपले हे प्रयत्न या स्त्रीचं आयुष्य सुखी करण्यासाठी चाललेले आहेत की आपलं सगळ्यांचंच ? सगळ्यांचं आयुष्य सुखी करणं हा उद्देश असेल तर या स्त्रीवरच जास्त जोर देत बसणं चूक ठरेल.
( सगळे एकमेकांकडे पाहतात.)

समुदाय : तुम्ही घाबरू नका पंडितजी. शांत रहा.

स्त्री : अहो पण तुमचं हे सगळं परस्पर काय चाललंय ? माझं मन कुणीच बघत नाही !

समुदाय : वाव सगळ्या विचारांना आहे याचा अर्थ निर्णयच घ्यायचा नाही, मार्गाची निवडच करायची नाही आणि कृती शून्य ठेवायची असा नाही. हे सगळं करावंच लागेल. कदाचित वेळ थोडा जास्त लागेल इतकंच.

तरुण : नाही, हे एवढंच नसणार. कारण समजा आपण घेणार तसेच निर्णय हे श्री. नवरे घेत गेले असते म्हणजे अनेक विचार करून वगैरे तर आपणच त्याला कालापव्यय किंवा कालहरण म्हटलं असतं. निर्णय घेण्यासाठी कुठलातरी एक विचार शेवटी प्रभावी ठरणारच असेल तर तो निर्णय श्री.नवऱ्यांनी घेतला काय किंवा आपण घेतला काय फरक काय पडणार ?

समुदायः: याही विचाराला वाव आहेच. पण सध्या तू गप्प बस. कृतीची वेळ येईल तेव्हा तू पुढाकार घे.

तरुण : नाही, आपल्याच विरुध्द पॉईंट मांडण्यासाठी मी बोलत नव्हतो. आपली वैचारिक बाजू पक्की करताना एक कुठलातरी मुद्दा राहतोय असं मला वाटलं. विचार करता, या सगळ्या विचारांचा, चर्चेचा आणि वादाचा सारांश असाच दिसतोय की आमचं म्हणणं अधिक बरोबर आहे. तेव्हा अधिक बरोबर बाजूनं निकाल लागणं आता अपरिहार्य आहे. यात आता अधिक बोलण्यासारखं काही राहिलेलं नाही. सर्व बाजूंचा साधकबाधक विचार पूर्ण झालेला आहे. तेव्हा न्यायाधीशमहाराज --

नवरे : ( टोकाचं संतापून ) हे सगळं गेलं खड्डयात ! ( सगळे चमकतात. तो धुमसत उभा. इकडेतिकडे पाहतो आणि अचानक निघून जातो.)

समुदाय : न्यायाधीश महाराज, जागे व्हा, बघा, प्रतिवादीनं चक्क कोर्टातून पळ काढलेला आहे. यात त्यानं हार मानल्याचं तर सिध्द होतंच, पण मुख्य म्हणजे हा कोर्टाचा अपमान आहे. कोर्ट चालू असताना प्रतिवादीनं पळून जायचं म्हणजे काय ! निकाल ऐकायचासुध्दा सभ्यपणा दाखवू नये !?

कारखानदारः आता मेलेल्याला आणखी काय मारायचंय उगीच ! जाऊ दे !

समुदाय : तसं नव्हे. सांगायचा उद्देश इतकाच आहे की बाकीच्या बाबतीत कोर्ट जागं राहो की न राहो पण मानापमानाच्या बाबतीत कोर्टानं जागं राहिलंच पाहिजे ही आजपर्यंतची प्रथा आहे. कोर्ट आणि प्रेक्षकवर्ग यांच्यात हाच फरक आहे. एखादा नट रंगमंचावरून ताडताड निघून गेला तर प्रेक्षकवर्ग ते फारसं मनावर घेत नाही. त्याचं तसं जाणं पटलं म्हणजे झालं -- एवढंच प्रेक्षक पाहतो. कोर्टासमोर वागताना नुसतं ' पटणं ' हे मूल्य कसं चालेल ? कोर्ट कधीच असं खालच्या पायरीला येऊ शकणार नाही.

प्राध्यापकः ( जरा महत्त्वपूर्ण पध्दतीने ) ए समुदाय, हे बघ -- काय -- मी सगळं निरीक्षण करतोय -- काय -- ते कोर्ट, अपमान वगैरे सोड जरा -- काय -- मला जरा वेगळाच संशय येतोय -- ( सगळे गोळा होतात. स्त्री आहे तिथे उभी. ) तो जो इथनं निघून गेला ते काहीतरी मनाशी ठरवून गेलाय असं मला वाटतं. तो कुठं गेला, काय करतोय याच्यावर जरा बारकाईनं लक्ष ठेवायला हवं -- मला धोका वाटतोय --

समुदायः: छे ! कसला धोका न् कसलं काय !

कारखानदारः असं म्हणून नकोस हं -- पराभव झालेली माणसं फार धोक्याची असतात --

समुदाय : बरं मग म्हणणं काय तुमचं ?

पंडित : पुढील एकूण शक्यतांचा विचार करून आधीच उपाययोजना तयार ठेवा !

समुदाय : हं -- ( विचारात पडतो. एकदोन येरझाऱ्या घालतो. मग तरुणाला बाजूला घेऊन गुप्त आवाजात खुनशीपणे -- ) तसं काही वाटलं तर -- तर टाका त्याला -- मारून टाका -- जा -- ( तरुण निघतो.) थांब, इकडे ये -- याची कुठं वाच्यता करू नकोस -- विशेषतः तिच्यासमोर -- जा -- ( तरुण जायला लागतो. पण तो जाण्याआधीच एका कोपऱ्यातून श्री. नवरे एका हातात मशाल आणि एका हातात पिस्तूल घेऊन येतो.)

नवरे : ( वरच्या मजल्यावरील लोकांना खालून ओरडून सांगितल्याप्रमाणे --) ऐका ऽ...समुदाय आणि लोक हो, ऐका -- पाच मिनिटांच्या आत माझ्या बायकोला इकडे पाठवून द्या-- नाहीतर मी हे सगळं पेटवून देणार आहे -- जळून खाक व्हाल सगळे -- आणि बाहेर पडायचा कुणी प्रयत्न केलात तर गोळया घालून ठार केलं जाईल -- मुदत फक्त पाच मिनिटं -- मी इथं खाली उभा आहे -- आणि कुठल्याही दृष्टीनं तुमच्या आवाक्यात नाही --

प्राध्यापकः सांगत नव्हतो मी !

समुदाय : तुझ्या शहाणपणाचं कौतूक करत बसायची वेळ नाहीय ही -- पटकन निर्णय घ्यायला हवाय -- आणि वेळही अगदी कमी दिलाय त्यानं --

स्त्री : म्हणजे आता बळजबरीनं मिळवणार आहेत ते मला --

तरुण : मला वाटतं --

समुदाय : थांब जरा. असंच करू या --

प्राध्यापकः मला वाटतं --

कारखानदारः बरं का, मी काय म्हणतो --

पंडित : हे बघ, आता ते सगळं राहू द्या --

समुदाय : ( घाईनं,स्त्रीला --) जा तू खाली -- जा लौकर -- आता या क्षणी इतका धोका पत्करता येणार नाही --

स्त्री : पण मी म्हणते --

समुदाय : तू नुसती ऐक सध्या -- जा म्हणतो ना --

तरुण : पण मी म्हणतो, असं केलं तर --

समुदाय : ( जोरात ) गप्प बसा -- सध्या विचार नकोयत -- चल, तू जा पाहू -- ( तिला जवळजवळ ढकलतोच. ती जाते. नंतर --) आत्ता धोका नकोय -- घेऊ दे तिला तो ताब्यात -- नंतर आपण बंदोबस्त करू बरोबर --

पंडित : ठीक आहे, चला --बघू काय काय होतं ते.

तरुण : माझ्या मते ही तू चूक केलीस -- मी धोका पत्करायला तयार होतो की --

कारखानदारः तिला मारून टाकून त्यानं आत्महत्या करून टाकली म्हणजे संपलंच की सगळं --( समुदाय खिडकीतून लपून पाहात असल्यासारखा --) गेली का ती --

समुदाय : हं -- चाललीय ती -- ( इकडे स्त्री पुढे येते. चेहऱ्यावर ढोंगी हसू आणलेलं --)

स्त्री : ( नवऱ्याला ) खरंच शूर आहात तुम्ही ! खूप आवडलं मला ! खरंच !

नवरे : ( तिला डोक्यावर दणका देतो. ती हेलपाटते. उभी राहते --)ढोंग नकोय ! बंद कर सगळं नाटक।

` ( जोरात ) आणि तुम्हीही ऐका -- जर का कुणी दगाबाजी करायचा प्रयत्न केला तर हिच्या डोक्याच्या चिंध्या करून टाकीन -- शहाणे असाल तर विसरा आता तिला --( स्त्रीला --) चल -- ( ती तो सांगेल तशी जाते. दोघेही जातात. इकडच्याही दृश्यावरचा प्रकाश जातो. कोरसचा प्रवेश. कोरसवर प्रकाश...)

को.--तिघेही: कृतीची वेळ आली तेव्हा विचारस्वातंत्र्याचा संकोच झाला. कृतीची वेळ आली तेव्हा विचारस्वातंत्र्याचा संकोच झाला.

पु.१ : विमानांचे अपहरण झाले.

पु.२ : कृतींच्या ठिणग्या पडल्या.

स्त्री १ : युध्दांचे वणवे पेटले.

पु.१ : आता खऱ्याखोट्याचा प्रश्न नव्हता.

पु.२ : बरोबर-चूक, चांगले-वाईट यांचाही नव्हता.

स्त्री १ : आपले म्हणणे अंमलात आणण्याच्या प्रयत्नात यश मिळवण्याचाच फक्त प्रश्न होता.

तिघेही : यात -- कोर्टाला -- काहीही -- काम -- नव्हते !

( जातात. -- पुन्हा दृश्यावर प्रकाश. )

समुदाय : सगळे जरा शांत रहा -- सध्या तुम्ही कुणीही विचार करू नका -- वेळ फार थोडा आहे -- ( तरुणाला ) हे बघ, आता असं करायचं -- पाठलाग करायचा -- तो जेव्हा गर्दीतून चालेल तेव्हा इतका सावध राहू शकणार नाही -- संधी साधून पाठीत सुरा खुपसायचा -- लगेच दुसरा वार मानेवर करायचा -- मग पोटात, छातीत, तोंडावर असे वार करायचे -- रक्ताच्या चिळकांड्या उडून सडा पडला पाहिजे --धमक्या देतोय नालायक -- जा --( तरुण लगेच जातो.)

पंडित : म्हणजे तुम्ही संतापलातच शेवटी --

समुदाय : अन्यायाचा प्रतिकार जेव्हा कमीत कमी वेळात करायचा असतो आणि ताबडतोब न्यायाची प्रस्थापना करायची असते तेव्हा संतापण्याशिवाय दुसरा मार्ग नसतो. ते असू दे. चर्चा नको. आपण मागोमाग गेलं पाहिजे. चला. ( तो पुढे जातो. मागोमाग बाकीचे जातात. कोरसचा प्रवेश.)

स्त्री १ : ( पोवाड्याच्या चालीत ) -- ठरल्याप्रमाणं सगळं झालं.

( तिची प्रत्येक ओळ पु.१ व पु.२ दोघेही परत म्हणत जातात.)

नवरे बाबाचा खून झाला<br>
रक्त रक्त रक्त झालं....<br>
समुदाय विजयी झाला...<br>
पण बाई बिघडली,बाई बिघडली --

तिघेही : बाई बिघडली, बाई बिघडली -- जी जी जी --

स्त्री १ : ( कीर्तनाच्या थाटात ) आपला नवरा रक्ताच्या थारोळ्यात पडलेला पाहून बाई मूर्च्छित झाली ! तिला इस्पितळात नेलेलं आहे, औषधपाणी झालेलं आहे आणि जरा बरी झाल्यावर समुदाय जेव्हा तिला घेऊन चालला --

पु.१ : तेव्हा तरुणाला मनातनं वाटतंय की शौर्य तर मी गाजवलं--आणि स्त्रीला न्यायच्या वेळी पुन्हा समुदायच --

पु.२ : पंडितजींना वाटतंय यात संस्कृत, संस्कृती, आणि चारित्र्य सगळंच पडद्याआड गेलेलं आहे --

स्त्री १ : आणि कारखानदाराला काय वाटतंय -- ?

कारखानदाराला वाटतंय की -- आता खरं उत्पादनाचं महत्त्व -- लोकांना -- कळेल --

तिघेही : राहता राहिले प्राध्यापक ...ते...आपले...निरीक्षण...करीत...राहिले ! गोपाळकृष्ण महाराज की -- जय !

( जातात. आता समुदाय आणि स्त्री. )

स्त्री : ( गदगदत ) का मारलंत तुम्ही त्यांना ? का ?

समुदाय : ( समजावत ) असं काय करतेस ? त्याच्या जाचातून तुला सोडवायचे सभ्य मार्गच हाताळत होतो ना आम्ही ? ही पाळी त्यानंच आणली की नाही ?

स्त्री : माझा विश्वासघात केलात तुम्ही. तुमचा हा डाव तुम्ही गुप्त ठेवलात.

समुदाय : अगं, असं काही नाहीय -- सगळं ऐनवेळी -- त्या त्या वेळी ठरवत जावं लागलं --

स्त्री : पण मला तेसुध्दा जिवंत राहायला हवे होते --

समुदाय : अगं, पण तुला स्वातंत्र्य हवं होतं ना ?

स्त्री : पण तेसुध्दा जिवंत रहायल हवे होते...क्रूर आहात तुम्ही...क्रूर आहात...( ओक्साबोक्सी रडत ) त्यांच्या प्रेतावरसुध्दा वार केलेत तुम्ही...( हमसत राहते. काही क्षण.)

समुदाय : बरं, आता होऊन गेलेल्या गोष्टी काही बदलता येणार नाहीत. आता तुझी काय इच्छा आहे ते सांग.

स्त्री : ( उमाळ्यानं--) माझ्या मनातून मी पूर्णपणे काढून टाकलेलं नव्हतं त्यांना...हे कधीच ओळखलं नाहीत तुम्ही...ही शक्यतासुध्दा आली नाही तुमच्या मनात...

समुदाय : कबूल आहे. झाली असेल चूक.

स्त्री : ( संतापून ) झाली असेल चूक !!! अं !!!

समुदाय : अगं, असं काय करतेस...हळू हळू विसरता येईल सगळं...उरलेलं आयुष्य सुखात जाईल...खरंच...

स्त्री : उरलेलं आयुष्य...( भ्रमिष्टपणे ) उरलेलं आयुष्य...( गळाठून बसत ) आता आयुष्य उरलेलंच नाही...उरलेलंच नाही...( प्राध्यापक, पंडित, कारखानदार आणि तरुण येतात.)

प्राध्यापकः अरेरे...काय अवस्था झालीय ही...थांबा, मी तिचं सांत्वन करतो...तिची समजूत घालतो...

पंडित : भगवत् गीतेचा अठरावा अध्याय तिला एकोणीस वेळा वाचायला सांगा --- सगळं काही ठीक होईल.

कारखानदारः साला या असल्या प्रॉब्लेमवर आपल्याला काही सुचतच नाही...

स्त्री : ( किंचाळते ) त्यांना परत जिवंत करून आणा ऽऽऽ...( सगळे थक्क होऊन पाहात उभे.)

तरुण : मी...मी...( समुदाय त्याला खुणेनं गप्प करतो.)

स्त्री : ( सावकाशपणे ) जा...जा तुम्ही...( किंचाळते ) जाऽऽऽ...( काही क्षण...सगळे हळूहळू वळतात...जातात...समुदाय पुन्हा वळावं अशा विचारात असतो पण तिच्याकडे पाहून त्याला धीर होत नाही...तोही जातो...)...गेलात तुम्ही...सगळे गेलात...का गेलात...घाबरले...बिचारे...मी एक पत्नी होते...मी माताही झाले असते...माताही झाले असते...( तरुण येतो.)

तरुण : ( हळूहळू पुढे येऊन ) ...मी...मी...लग्न करीन तुमच्याशी...तुझ्याशी...

स्त्री : ( पाहून ) तू...?( संतापानं थरथरते. बेशुध्द पडते. तरुण जवळजवळ पळूनच जातो. या दृश्यावर अंधार होत जातो. कोरसचा प्रवेश आणि त्यांच्यावर प्रकाश...)

को.तिघेहीः ( सावकाशपणे ) प्रश्न सुटले ?
सुटले प्रश्न ?

पु.१ : प्रश्न सुटलेच नाहीत.

पु.२ : की त्यांचे दुसरे प्रश्न झाले ?

स्त्री १ : की ते प्रश्न सोडवणारी मनंच नुसती जखमी झाली ?

तिघेही : आता बहुतेक एकच दृश्य राहिलं आहे...( जातात. दृश्यावर प्रकाश पडतो तेव्हा समुदाय, कारखानदार, प्राध्यापक, तरुण आणि पंडित...)

समुदाय : डॉक्टरांच्या मते ती वेडी झाली आहे...आणि सुधारण्याची शक्यता फार कमी आहे...म्हणजे प्रयत्न फक्त चालू ठेवायचे इतकंच...

तरुण : मग श्रीयुत समुदाय, हा आपला विजय समजायचा की पराजय ?

समुदाय : मला तर असं वाटायला लागलंय की प्रत्येक माणूस जसा अनेक माणसांचं मिश्रण असतो तशी प्रत्येक घटनाही अनेक अर्थांचं मिश्रण असते...आपण स्वातंत्र्यासाठी झटलो...अन्यायाविरुध्द लढा दिला...हेच शेवटी महत्त्वाचं आहे...

प्राध्यापक : मला असं वाटतं की त्या स्त्रीला स्वातंत्र्य पेललं नाही...

कारखानदार एवढं मनावर घ्यायला नको होतं तिनं...

तरुण : कमकुवतच होती ती ...म्हणूनच वेडी झाली...

पंडित : श्रध्दा नव्हती तिची कुठंच...

समुदाय : म्हणजे ती अन्याय व्हायच्याच लायकीची होती असं एकूण दिसतंय ---

सगळे : होय -- नाही तर काय !

समुदाय : म्हणजे या बाबतीत आपलं वैचारिक एकमतच झालं म्हणायचं ! छान !

प्राध्यापकः स्त्रिया कमकुवत का होतात यावर संशोधन करावं असा माझा विचार आहे.

पंडित : प्राध्यापक महाशय, तुम्ही जे निष्कर्ष काढाल ते सगळ्यांना पटतील असं समजू नका तुम्ही --

प्राध्यापकः छे छे -- असं मी मुळीच समजत नाही -- पण अभ्यासाचा उपयोग होतोच -- त्याचं काय आहे -- प्रबंधाच्या निमित्तानं...( आता मूक चर्चा चालू...पुन्हा कोरसचा प्रवेश...)

कोरस (तिघेही):. संपलं !

पु.१ : म्हणजे सुरुवात झाली.

पु.२ : पुन्हा काहीतरी संपण्यापूर्वीची सुरुवात झाली.

स्त्री १ : पुन्हा विचारस्वातंत्र्य आलं !

तिघेही : जेहते कालाचे ठायी...
गोपालकृष्ण महाराज की जय !
( झटकन जातात.)

... पडदा पडत जातो...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

**दूरध्वनी - ४२२ ७८४७.**